मुंबई शहर भूमि अभिलेख विभागातील ४२ अस्थायी पदांना दिनांक १/३/२०१५ ते दिनांक २९/२/२०१६ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएसटी-२०१५/प्र.क्र.६१/ई-८,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ७ एप्रिल, २०१५.

**वाचा:-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-१००४/प्र.क्र.८८/ल-१, दि. २८ मार्च, २००६.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. असंक-१००४/प्र.क्र.-१२/[भाग-२] /२००४/वित्तीय सुधारणा-४, दिनांक ४ ऑक्टोबर, २००४.
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. इएसटी-२०१४/प्र.क्र.७१/ई-८, दि. १७ एप्रिल, २०१४.
४) जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांचे क्र. मुंशभूअ/भूदमूअशा/आस्था-१ व २/मुदतवाढ/ २०१५/७०१७, दि. २४ फेब्रुवारी, २०१५.

**शासन निर्णय:-**

शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-१००४/प्र.क्र.८८/ल-१, दिनांक दि. २८ मार्च, २००६ अनुसार मुंबई शहर भूमि अभिलेख विभागातील अस्थायी पदांचा आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे.

२. जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्या आस्थापनेवरील मुंबई शहर भूमापन व भूमि अभिलेख शाखेतील खालील ४२ अस्थायी पदांना उपरोक्त दिनांक १७/०४/२०१४ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१/०३/२०१४ ते दिनांक २८/०२/२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली

आहे. आता सदरहू खालील ४२ अस्थायी पदांना दिनांक १ मार्च,२०१५ ते दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | सहाय्यक संचालक, नगररचना | १ |
| २ | सहाय्यक अधिक्षक तथा नगरभूमापन अधिकारी | २ |
| ३ | सहाय्यक लेखा अधिकारी | १ |
| ४ | परिरक्षण भूमापन | ११ |
| ५ | वरिष्ठ आरेखक व आरेखक | ७ |
| ६ | लघुलेखक (नि.श्रे.) | १ |
| ७ | वरिष्ठ लिपिक | २ |
| ८ | वरिष्ठ बांधणीकार | १ |
| ९ | वाहनचालक | १ |
| १० | दप्तरबंध खलाशी | १ |
| ११ | खलाशी | ९ |
| १२ | शिपाई | ५ |
| | **एकूण पदे** | **४२** |

**३.** उपरोक्त ४२ पदांपैकी एकही पद सहा महिन्यापेक्षा अधिक कालावधीकरीता रिक्त नव्हते वा व्यपगत झालेले नाही. तसेच एकही पद कमी करण्यात आलेले नाही. या अटीच्या अधिन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

**४.** यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक सी-१, २०२९-जमीन महसूल-१०३ भूमि अभिलेख-१०३ (०१)(०३) जिल्हाधिकारी, मुंबई (२०२९ ०७५२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून वित्तीय वर्ष २०१५-२०१६ खाली मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

**५.** सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक असंक-१००४/प्र.क्र.-१२/ [भाग-२] /२००४/वित्तीय सुधारणा-४, दिनांक ४ ऑक्टोबर, २००४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०३३११९२२२९०६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Chandrakant Nivrutti Padale
Date: 2015.04.07 15:51:59 +05'30'

**(चं. नि. पाडळे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) जिल्हाधिकारी, मुंबई शहर, जुने जकात घर, फोर्ट, मुंबई-०१.
२) जमाबंदी आयुक्त व संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
४) प्रधान लेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
५) प्रधान लेखापाल, महाराष्ट्र १ (लेखापरीक्षा), मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) वित्त विभाग, कार्यासन व्यय-९/ वित्तीय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई-३२.
९) कार्यासन अधिकारी, कार्यासन ब-१, ल-१, ई-६, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) निवड नस्ती, कार्यासन- ई-८,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.